**महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक धोरण, २०१० अंतर्गत राज्यातील जिल्हयाच्या ठिकाणी प्रतिवर्षी ग्रंथोत्सव हा उपक्रम आयोजित करण्याबाबत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मराग्रं-२५१७/(२१७/१५)/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०१७

<u>वाचा :</u> १) महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत ग्रंथोत्सव २०१५ चे आयोजन करण्यासंदर्भात दि २८/०९/२०१५ रोजी आयोजित केलेल्या बैठकीचे इतिवृत्त.
२) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.४/ग्रंथोत्सव/२०१५-१६/७७६३-६४, दिनांक ०५/१०/२०१५

<u>प्रस्तावना:-</u>

ग्रामीण व शहरी भागातील लोकांमध्ये वाचनसंस्कृतीमध्ये वाढ व्हावी या हेतूने राज्य शासनातर्फे ग्रंथोत्सवाचे आयोजन करण्यात येते. ग्रंथप्रेमींना एकाच ठिकाणी विविध ग्रंथ प्राप्त व्हावेत यासाठी तसेच प्रकाशक व ग्रंथविक्रेता यांना ग्रंथविक्रीसाठी एकाच ठिकाणी आवश्यक ती सुविधा उपलब्ध व्हावी हा ग्रंथमहोत्सव आयोजनाचा मुख्य उद्देश आहे. याकरिता शासन पातळीवरील प्रयत्नांचा भाग म्हणून प्रतिवर्षी ग्रंथोत्सवाचे आयोजन करण्यात येते. ग्रंथोत्सव ही योजना यापूर्वी मराठी भाषा विभागामार्फत राबविण्यात येत होती. सन २०१६-१७ पासून सदर योजना उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे दि. १६/०७/२०१६ च्या शासननिर्णयान्वये हस्तांतरीत करण्यात आलेली आहे. राज्यशासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील ग्रंथालय संचालनालयामार्फत ग्रंथोत्सव हा उपक्रम राज्यातील जिल्हयाच्या ठिकाणी राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:</u>

महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत ग्रंथोत्सव हा उपक्रम प्रतिवर्षी राज्यातील जिल्हयाच्या ठिकाणी राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील सर्व जिल्हयाच्या ठिकाणी ग्रंथोत्सव हा उपक्रम माहे जानेवारी- फेब्रुवारी महिन्यात राबविण्यासाठी सर्व जिल्हा माहिती अधिकाऱ्यांनी जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांना सहकार्य करावे.

३. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांनी सदर निधी संबंधित जिल्हयाचे जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांना वितरित करावा.

४. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या त्यांच्या अधिपत्याखालील दुय्यम अधिका-यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

ग्रंथोत्सव आयोजनाच्या खर्चाचा सर्व तपशील संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांच्याकडून ग्रंथोत्सव झाल्यानंतर एक महिन्याच्या कालावधीत ग्रंथालय संचालक,मुंबई यांनी प्राप्त करुन घ्यावा व सदर तपशील शासनास सादर करावा.

५. संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांनी महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई यांच्या निरिक्षणासाठी खर्चाचे लेखे तयार ठेवावे तसेच इतर खर्चाबाबतचे विवरणपत्र व अर्थसहाय्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करुन द्यावेत. ग्रंथोत्सवाचे आयोजन करताना जिल्हा ग्रंथालय अधिकारी यांनी खालीलप्रमाणे ग्रंथोत्सव जिल्हा समन्वय समिती स्थापन करावी.

| अनु. क्र | पदाधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हापरिषद | सदस्य |
| ३ | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| ४ | संबंधित जिल्हयातील प्रकाशक संघटनेचे अध्यक्ष/ कार्यवाहक | सदस्य |
| ५ | संबंधित जिल्हयातील साहित्य परिषदेचे किंवा संस्थेचे अध्यक्ष/ कार्यवाहक | सदस्य |
| ६ | जिल्हा ग्रंथालय संघाचे अध्यक्ष/ कार्यवाहक | सदस्य |
| ७ | संबंधित जिल्हयातील जिल्हा ग्रंथालय अधिकारी | सदस्य सचिव |

६. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. डब्ल्यु ४ , (०२)(०२) शासकीय मध्यवर्ती , विभागीय व जिल्हा ग्रंथालये (२२०५ ०२८९) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०२१७११२६३८७००८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2017.02.17 11:30:16 +05'30'

( सु. हे. पाटणकर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर
३) ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५) प्रधान सचिव(उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
६) प्रधान सचिव (मराठी भाषा विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
८) संचालक/ उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
९) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
१०) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मितीमंडळ, मुंबई
११) वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
१२) सर्व जिल्हा ग्रंथालय अधिकारी, ग्रंथालय संचालनालय
१३) निवडनस्ती (साशि-५).